आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत असणाऱ्या क्षेत्रिय कार्यालयांमध्ये अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-३७१७/प्र.क्र.२१४/२०१७/का.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०२ जून, २०१७.

संदर्भ :-

**१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/ कार्यासन १२, दिनांक १७.११.२०१६.**

प्रस्तावना :-

राज्य शासनाच्या विविध विभागात/विभागाच्या अधिपत्याखालील मंडळे/महामंडळातील पदांवर प्रतिनियुक्तीने करण्यात येणाऱ्या नियुक्तीसाठी अधिकारी/कर्मचाऱ्यांसंदर्भात अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपध्दती याबाबतचे धोरण संदर्भाधीन शासन निर्णयान्वये तयार करण्यात आले आहे. प्रस्तुत, शासन निर्णयातील परिच्छेद ६(५) मध्ये नमूद केल्यानुसार विभागाने आपल्या अधिपत्याखालील मंडळे/महामंडळावरील पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसंदर्भात निवड करण्यासाठी विभागाच्या सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समिती गठीत करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

२. त्यानुसार, या विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांतील पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्तीकरीता अधिकाऱ्यांची निवड करण्याबाबत समिती गठीत करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. प्रस्तुत शासन निर्णयामध्ये दिलेल्या तरतूदी विचारात घेऊन, आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांतील पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्तीकरीता अधिकाऱ्यांची निवड करण्याबाबत समिती गठीत करण्याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये राज्य शासनाच्या विविध विभागात / विभागाच्या अधिपत्याखालील मंडळे/महामंडळातील पदांवर प्रतिनियुक्तीने करण्यात येणाऱ्या नियुक्तीसाठी धोरण निश्चित करण्यात आले आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १७.१२.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ६(५) मध्ये नमूद केल्यानुसार, आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक आणि महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांच्याकडील पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याकरीता खालीलप्रमाणे त्रिसदस्यीय समिती गठीत करण्यात येत आहे.

**आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्याकडील पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी निवड करण्याकरीता शिफारस करण्याकरीता नियुक्त करण्यात येणारी त्रिसदस्यीय समिती**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीवरील पदनाम |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १. | सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव (आदिवासी विकास) | अध्यक्ष |
| २. | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | सदस्य |
| ३. | उप सचिव (क्षेत्रीय आस्थापना), आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ४. | उप सचिव (का.१२), सामान्य प्रशासन विभाग | निमंत्रित सदस्य |

**महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांच्याकडील पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी निवड करण्याकरीता शिफारस करण्याकरीता नियुक्त करण्यात येणारी त्रिसदस्यीय समिती**

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | समितीवरील पदनाम |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १. | सचिव / प्रधान सचिव / अपर मुख्य सचिव (आदिवासी विकास) | अध्यक्ष |
| २. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक | सदस्य |
| ३. | उप सचिव (क्षेत्रीय आस्थापना), आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ४. | आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक | निमंत्रित सदस्य |
| ५. | उप सचिव (का.१२), सामान्य प्रशासन विभाग | निमंत्रित सदस्य |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०२११२४५१४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2017.06.02 11:28:57 +05'30'

**( ल. गो. ढोके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
२) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
३) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक,
६) उप सचिव (का.१२), सामान्य प्रशासन विभाग,
७) सर्व उप सचिव, आदिवासी विकास विभाग,
८) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग,
९) निवड नस्ती.